महाराष्ट्र-कर्नाटक सीमा भागातील महाराष्ट्र शासनाने दावा सांगितलेल्या ८६५ गावांतील मराठी भाषिक गावांतील नागरिकांना महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना लागू करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मफुयो-२०२२/प्र.क्र.३३०/आरोग्य-६**
जी.टी. रुग्णालय आवार, १० वा मजला,
मंत्रालय, मुंबई -४०० ००१
दिनांक : ०३ एप्रिल, २०२३

वाचा -

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः रास्वयो-२०१८/प्र.क्र.७४/आरोग्य-६, दिनांक २६.०२.२०१९
२) सामान्य प्रशासन विभाग, परिपत्रक क्रमांकः मकसी-१००७/प्र.क्र.३६/का.३६, दिनांक १० जुलै, २००८
३) मंत्रिमंडळ सचिवांचे दिनांक ०८ मार्च, २०२३ रोजीचे पृष्ठांकन व त्यासोबतचे मंत्रिमंडळ बैठक दिनांक ०२ मार्च, २०२३ चे कार्यवृत्त

प्रस्तावना -

राज्यामध्ये दि. २६ फेब्रुवारी, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारित महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेचे आयुष्मान भारत प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेशी संलग्नीकरण करुन एकत्रित स्वरुपात राबविण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला. राज्य शासनाकडून राबविण्यात येत असलेली महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना ही महाराष्ट्र राज्यातील कुटुंबांना लागू आहे. तथापि महाराष्ट्र- कर्नाटक सीमा भागातील महाराष्ट्र शासनाने दावा सांगितलेल्या ८६५ गावातील मराठी भाषिक गावांतील नागरिकांना महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना लागू करण्याची मागणी तेथील नागरिकांकडून करण्यात येत आहे. महाराष्ट्र शासनाने महाराष्ट्र कर्नाटक सीमावर्ती क्षेत्रातील हक्क सांगितलेल्या कर्नाटक राज्यातील ८६५ गावांची यादी संदर्भाधीन शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग दि. १० जुलै २००८ नुसार असेल. सदर सर्व बाबींचा विचार करुन यापूर्वी मंत्रिमंडळाने मान्यता दिलेल्या योजनेमध्ये अंशत: सुधारणा करण्याचे प्रस्तावित होते. त्यानुसार महाराष्ट्र-कर्नाटक सीमा भागातील महाराष्ट्र शासनाने दावा सांगितलेल्या ८६५ गावातील मराठी भाषिक गावांतील नागरिकांना विद्यमान महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेमध्ये समाविष्ट करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

महाराष्ट्र-कर्नाटक सीमा भागातील महाराष्ट्र शासनाने दावा सांगितलेल्या बेळगांव, कारवार, कलबुर्गी व बिदर जिल्हयांतील १२ तहसीलमधील ८६५ गावांतील १) अंत्योदय अन्न योजना, २) प्राधान्य गटातील कुटुंबे व ३) अन्नपुर्णा शिधापत्रिकाधारक कुटुंबांचा समावेश महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेच्या लाभार्थ्यांमध्ये करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त कुटुंबांना सदर योजनेचा लाभ हमी तत्त्वावर देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. विद्यमान महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेत भविष्यात लाभार्थ्यांचे काही निकष बदलल्यास व इतर काही बदल झाल्यास ते बदल महाराष्ट्र-कर्नाटक सीमा भागातील महाराष्ट्र शासनाने दावा सांगितलेल्या ८६५ गावांतील लाभार्थी कुटुंबांना लागू राहतील.

४. महाराष्ट्र-कर्नाटक सीमा भागातील महाराष्ट्र शासनाने दावा सांगितलेल्या ८६५ गावांतील लाभार्थी कुटुंबाना महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेचा लाभ देण्याकरिता अनुज्ञेयता तपासण्यासाठी कर्नाटक राज्यातील सक्षम प्राधिकाऱ्यांने निर्गमित केलेली शिधापत्रिका तपासली जाईल. व्यक्तीची ओळख आधार कार्डव्दारे व ते नसल्यास मूळ योजनेने मान्य केलेल्या १४ ओळखपत्राद्वारे ओळख पटविली जाईल. शिधापत्रिका व आधार कार्ड द्वारे निवासाची खात्री केली जाईल. तसेच राज्य आरोग्य हमी सोसायटीने ठरवलेल्या मसुद्यानुसार कुटुंबाच्या सदस्याचे स्व-घोषणा पत्र (सोबत जोडल्याप्रमाणे) बंधनकारक राहील.

५. सदर नागरिकांना योजनेंतर्गत प्रति कुटुंब/प्रति वर्ष रु.१.५ लक्ष रकमेचे (मुत्रपिंड प्रत्यारोपणासाठी प्रतिवर्ष रु. २.५० लाख) विमा सरंक्षण रक्कम व ३४ तज्ञसेवा मधील ९९६ उपचारांचा लाभ अनुज्ञेय राहील.

६. सदर सीमा भागातील ८६५ गावांतील कुटुंबांना महाराष्ट्र राज्यातील कोणत्याही शासकीय/ खाजगी अंगीकृत रुग्णालयांमधून (बेळगाव येथील के.एल.इ. हॉस्पिटल व पणजी येथील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय रुग्णालयासह) महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेचा लाभ घेण्यास मान्यता देण्यात येत आहे.

७. त्याचप्रमाणे महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेअंतर्गत सध्या अंगीकृत असलेल्या १००० रूग्णालयांव्यतिरिक्त अतिरिक्त १४० रुग्णालये कर्नाटकला लागून असलेल्या महाराष्ट्र राज्यातील ८ जिल्ह्यांमध्ये अंगीकृत करण्यास व १० मराठी भाषिक असणारी रुग्णालये महाराष्ट्र कर्नाटक सीमा भागातील बेळगांव, कारवार, कलबुर्गी, बिदर या मराठी भाषिक जिल्ह्यांमध्ये अंगीकृत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

८. अतिरिक्त १५० रुग्णालये अंगीकृत करण्याची कार्यपध्दती खालीलप्रमाणे असेल....

अ) अतिरिक्त १५० रुग्णालये नेमण्यासाठी संबंधित विमा कंपनी बरोबर वाटाघाटी द्वारे अतिरिक्त विमा हप्ता ठरवण्यात येईल.

आ) अतिरिक्त १५० रुग्णालयात येणाऱ्या महाराष्ट्रातील अनुज्ञेय लाभार्थी कुटुंबांच्या दाव्यांची अदायगी विमा कंपनी मार्फत आणि कर्नाटकातील अनुज्ञेय लाभार्थी कुटुंबांच्या दाव्यांची अदायगी हमी तत्वावर राज्य आरोग्य हमी सोसायटी मार्फत करण्यात येईल.

इ) अतिरिक्त १५० रुग्णालयात येणाऱ्या महाराष्ट्रातील आयुष्मान कार्ड लाभार्थी कुटुंबांच्या दाव्यांची अदायगी विमा कंपनी मार्फत व हमी तत्वावर राज्य आरोग्य हमी सोसायटी मार्फत प्रचलित पद्धतीनुसार करण्यात येईल. तर कर्नाटकातील आयुष्मान कार्ड लाभार्थी कुटुंबांच्या सर्व दाव्यांची अदायगी हमी तत्वावर राज्य आरोग्य हमी सोसायटी मार्फत करण्यात येईल.

९. यासाठीच्या खर्चाची रक्कम विद्यमान महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेच्या सर्वसाधारण या लेखाशिर्षांतर्गत राज्य शासनाकडून उपलब्ध करुन देण्यात येईल.

१०. सदर शासन निर्णय मा. मंत्रिमंडळाने दि. ०२ मार्च, २०२३ रोजी घेतलेल्या निर्णयास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२३०३३१२२४३४००८१७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

संजय खंदारे
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,
मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मंत्री, आरोग्य व कुटुंब कल्याण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
आयुक्त, आरोग्य सेवा व कुटुंब कल्याण तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान मुंबई -०१
विभागीय आयुक्त (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, वरळी, मुंबई
उप महासंचालक, आधार (यु.आय.डी), टेलिफॉन एक्चेंज बिल्डींग, कफ परेड, मुंबई
अतिरीक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालीका, मुंबई
जिल्हाधिकारी (सर्व)
संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
संचालक, वैद्यकिय शिक्षण विभाग, बृहन्मुंबई महानगरपालीका, मुंबई
संचालक, वैद्यकिय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व)
जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
नियंत्रक, शिधावाटप, मुंबई
संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
सहसंचालक/उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळे (सर्व)
जिल्हा पुरवठा अधिकारी, (सर्व)
जिल्हा माहिती अधिकारी (सर्व)
अधिष्ठाता, शासकीय वैद्यकिय महाविद्यालये व रुग्णालये (सर्व)
सह सचिव / उप सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व कार्यासने , सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई

सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, विधानभवन, मुंबई- २१
भारतीय जनता पक्ष , महाराष्ट्र प्रदेश वसंतराव भगवान चौक, नरीमन पाईंट , मुंबई-२०
शिवसेना, शुभ-दीप बंगलो, लँडमार्क सोसायटी, ठाणे.
शिवसेना (उध्दव बाळासाहेब ठाकरे), शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर मुंबई- २८
इंडीयन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय)समिती टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई
राष्ट्रवादी कॉंग्रेस पक्ष, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पाईंट मुंबई- २१
बहुजन समाज पक्ष, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई ४०० ००१
भारतीय कम्युनिस्ट पक्ष, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस. व्ही. पटेल रोड, मुंबई ४०० ००४
भारतीय कम्युनिस्ट पक्ष, मार्क्सवादी, महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई -१३
निवड नस्ती.

स्व- घोषणा पत्र

मी श्री./श्रीमती/कु. ---------------------------------------- प्रमाणित करतो/करते की, मी महाराष्ट्र शासनाने दावा सांगितलेल्या कर्नाटक राज्यातील मु. --------------- ता.-------------, जिल्हा----------------- येथील रहिवासी आहे. माझे कुटुंब या पत्यावर गेली ---------- इतके वर्ष राहत असून आम्ही मराठी भाषिक आहोत. सत्यापानासाठी माझा अधिवास दाखला सोबत जोडला आहे. माझा शिधापत्रिका क्र. ------------------------- असा असून वार्षिक उत्पन्न रु.--------------- इतके आहे.

माझ्या कुटुंबात खालील सदस्य आहेत.

| .क्र. | कुटुंबातील सदस्यांची नावे | कुटुंब प्रमुखाशी नाते | आधार क्रमांक |
|---|---|---|---|
| | | | |
| | | | |
| | | | |
| | | | |
| | | | |

मी घोषित करतो की, वर दिलेले कथन सत्य, बिनचूक असून यामध्ये भविष्यात ही माहिती खोटी अथवा चुकीची आढळल्यास, होणाऱ्या नुकसान भरपाईसाठी व महाराष्ट्र शासनाकडून होणाऱ्या कायदेशीर कारवाईस पात्र राहीन, याची मला जाणीव आहे.

(रुग्णाचे नाव व स्वाक्षरी)

दिनांक :-

हे स्व-घोषणा पत्र यांच्या समक्ष दिले:

१) अंगीकृत रुग्णालयातील आरोग्य मित्राचे नांव

२) वैद्यकीय समन्वयक अधिकाऱ्याचे नाव

अंगीकृत रुग्णालयाचे नांव व पत्ता -----------------------------------------------